उस्मानाबाद येथील जी.एन.एम. नर्सिंग स्कुलच्या
एकूण २६ अस्थाई पदांना मुदतवाढ देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

**शासन निर्णय क्रमांकः अपदे-२०१९/प्र.क्र.२८२/आरोग्य-४,**

१० वा मजला, संकुल इमारत,
जी.टी.हॉस्पिटल आवार, मुंबई-४०० ००१,
तारीख: २९ जून, २०२०.

वाचा

१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांकः अपदे-२०१६/प्र.क्र.४४/आरोग्य-४, दि.२०.१०.२०१६.
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांकः पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.१०.०२.२०१७ दि.०३.१०.२०१७, दि.०८.०१.२०१८, दि.०५.०३.२०१८, दि.०७.०९.२०१८, दि.२१.०२.२०१९, दि.११.०९.२०१९ व दि.१२.०२.२०२०.
३) उपसंचालक (शुश्रुषा), मुंबई यांचे पत्र क्रमांकः संआसे/शुश्रुषा/कक्ष-९/टे-४/अस्थाई पदे नर्सिंग स्कूल/उस्मानाबाद/३६८६/१९, दि.२५.११.२०१९.
४) उपसंचालक (शुश्रुषा), मुंबई यांचे पत्र क्रमांकः संआसे/शुश्रुषा/कक्ष-९/टे-२/अ.पदेजीएनएम नर्सिंग स्कूल उ.बा/कटीत्रुसुधामा/५३१-३३/२०२०, दि.०४.०३.२०२०.

शासन निर्णय :-

उस्मानाबाद येथील जी.एन.एम. नर्सिंग स्कुलच्या खालील एकूण २६ अस्थाई पदांना संदर्भाधीन क्रमांक १ येथील दि.२०.१०.२०१६ च्या शासन निर्णयान्वये दि.१.१०.२०१६ ते दि.२८.०२.२०१७ या कालावधीकरीता मुदतवाढ देण्यात आली आहे.

**उस्मानाबाद येथील जी.एन.एम. नर्सिंग स्कुल (२६ अस्थाई पदे)**

| अ.क्र. | पदनाम | पदनिर्मितीचा शासन निर्णय | पदांची संख्या |
|---|---|---|---|
| १ | प्राचार्य | शासन निर्णय सा.आ.वि. क्र.डीएचसी-३०१०/ प्र.क्र.१८८/आरोग्य-३, दि.०२.०२.२०११ | १ |
| २ | उपप्राचार्य | | १ |
| ३ | पाठ्यनिर्देशका | | १४ |
| ४ | लघुटंकलेखक | | १ |
| ५ | लिपिक | | १ |

| | | | |
|---|---|---|---|
| ६ | ग्रंथपाल | | १ |
| ७ | प्रयोगशाळा सहाय्यक | | १ |
| ८ | वॉर्डन | | ३ |
| ९ | शिपाई | | ३ |
| जी.एन.एम.नर्सिंग स्कूल एकूण पदे | | | २६ |

२. उस्मानाबाद येथील जी.एन.एम. नर्सिंग स्कुलच्या उपरोक्त एकूण २६ अस्थाई पदांना पुढील अटींच्या अधीन राहून दि.१.०३.२०१७ ते दि.२८.०२.२०१८, दि.०१.०३.२०१८ ते दि.२८.०२.२०१९ व दि.०१.०३.२०१९ ते दि.२९.०२.२०२० व दि.०१.०३.२०२० ते दि.३१.०८.२०२० या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात येत आहे.

१) उपरोक्त पदांपैकी कोणतेही पद ६ महिन्यापेक्षा जास्त काळ रिक्त नाही व ज्या कारणांसाठी पदे मंजूर केली आहेत, त्या अटी व शर्तीचे पालन करण्यात आले आहे.

२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांकः पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.१०.०२.२०१७ दि.०३.१०.२०१७, दि.०८.०१.२०१८, दि.०५.०३.२०१८, दि.०७.०९.२०१८, दि.२१.०२.२०१९, दि.११.०९.२०१९ व दि.१२.०२.२०२० नुसार विहित करण्यात आलेल्या अटी व शर्तीचे कटाक्षाने पालन करण्यात यावे व त्याप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी. त्याचप्रमाणे कार्यालयाचा पदविषयक सुधारित आकृतिबंध उच्चस्तरीय समितीकडून अंतिमत: मान्य करुन घेण्याबाबत तात्काळ कार्यवाही करण्यात यावी.

३) विहीत मुदतीत पदांच्या आढाव्याची कार्यवाही पूर्ण न झाल्यास अस्थायी पदांना त्या पुढील कालावधीसाठी मुदतवाढ न मिळाल्यास व त्यामुळे अधिकारी / कर्मचारी यांच्या वेतन व भत्ताचा प्रश्न निर्माण झाल्यास त्याची जबाबदारी उपसंचालक, आरोग्य सेवा (शुश्रृषा), मुंबई यांची राहील.

३. सदर पदांवरील होणारा खर्च, मागणी क्रमांक आर-१ मधील मुख्य लेखाशीर्ष “२२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०६-पंचवार्षिक योजनातंर्गत योजना-राज्य योजनातंर्गत योजना, (०६) (०१)-मुफसल क्षेत्रातील अध्यापनेत्तर शासकीय रुग्णालये व दवाखाने (अनिवार्य) (२२१० ०२२६)” या लेखाशिर्षाखालील सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरीता मंजुर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय, वित्त विभागाचा शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.१०.०२.२०१७, दि.०३.१०.२०१७, दि.०८.०१.२०१८, दि.०५.०३.२०१८, दि.०७.०९.२०१८, दि.२१.०२.२०१९, दि.११.०९.२०१९ व दि.१२.०२.२०२० अन्वये प्रशासकीय विभाग प्रमुखांना प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१०१०१८१११९५८१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pradip M Balkavde

Digitally signed by Pradip M Balkavde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400001, st=Maharashtra, 2.5.4.20=8db6aab31faca2f1a89698a28c94703436c07cda664672d20607766dc59d345b, serialNumber=ed0fa40788bb5c0d7f76b869fa2e5835af215c6a80eae8f70eaf87b0cf68d63f, cn=Pradip M Balkavde
Date: 2020.06.29 15:51:02 +05'30'

**(प्र.मो.बलकवडे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१/२, मुंबई/ नागपूर,
२. संचालक, आरोग्य सेवा-१ आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई,
३. संचालक, आरोग्य सेवा-२ आरोग्य सेवा संचालनालय, पुणे,
४. उपसंचालक, आरोग्य सेवा ( शुश्रुषा), मुंबई,
५. उपसंचालक, आरोग्य सेवा, लातूर मंडळ, लातूर,
६. प्राचार्य, जी.एन.एम. नर्सिंग स्कूल, उस्मानाबाद,
७. जिल्हा शल्य चिकित्सक, उस्मानाबाद,
८. जिल्हा कोषागार अधिकारी, उस्मानाबाद,
९. जिल्हा आरोग्य अधिकारी, उस्मानाबाद,
१०.वित्त विभाग (व्यय-१३, अर्थसंकल्प-१९ ), मंत्रालय, मुंबई,
११.अवर सचिव ( सेवा-२/ सेवा-३/ सेवा-५ /अर्थसंकल्प ), सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई,
१२.निवडनस्ती ( आरोग्य- ४ ).